**ग्रामसभेचा अध्यक्ष ग्रामपंचायतीचा सरपंचच असला पाहिजे, महिलांसाठी ३० टक्के निधी खर्च करावा, ग्रामसभा उधळणाऱ्यांवर कडक कारवाई करावी, इत्यादी बाबींचा अभ्यास करण्याकरीता तज्ज्ञांची समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः व्हीपीएम-२०१४/प्र.क्र.१५७/पंरा-३**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ

फोर्ट, मुंबई - ४०० ००१

तारीख: १२ ऑगस्ट, २०१४

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र विधान परिषदेच्या सन २०१२ च्या दुसऱ्या (पावसाळी) अधिवेशनातील मा. मंत्री महोदय (ग्राम विकास) यांनी दिनांक १९.०७.२०१२ रोजी मुंबई ग्रामपंचायत (दुसरी सुधारणा) विधेयक क्र.१० वरील चर्चेच्या अनुषंगाने मा. विधानपरिषद सदस्य श्री. राजन तेली यांनी केलेल्या सूचनेच्या अनुषंगाने ग्रामसभेचा अध्यक्ष संबंधीत ग्रामपंचायतीचा सरपंचच असला पाहिजे, महिलांसाठी ३० टक्के निधी खर्च करावा, ग्रामसभा उधळणाऱ्यांवर कडक कारवाई करावी, या सूचनेंविषयी आश्वसन क्रमांक २९३ व २९४ देण्यात आलेले आहे. त्यानुसार मा. मंत्री (ग्राम विकास) महोदयांनी केलेली सूचना चांगली आहे. पण ती तपासून पाहण्यात येईल आणि सन्माननीय सदस्यांनी याबाबत ज्या सूचना केलेल्या आहेत त्याचा जरुर विचार करण्यात येईल व सुचविलेल्या आणखीन सुधारणा करणे शक्य आहे काय, याबाबत अभ्यास करण्यात येईल अशा आशयाचे आश्वासन दिलेले आहे. तसेच ग्रामसभेचा अध्यक्ष संबंधित ग्रामपंचायतीचा सरपंचच असला पाहिजे, महिलांसाठी ३० टक्के निधी खर्च करावा, ग्रामसभा उधळणाऱ्यांवर कडक कारवाई करावी, याबाबत अभ्यास करुन निर्णय घेणे गरजेचे असल्याने तज्ज्ञांची समिती गठीत करणे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन परिपत्रक**

ग्रामसभा ही ग्रामीण लोकशाही व्यवस्थापनेतील ग्रामस्तरावरील सर्वोच्च यंत्रणा आहे. देशाचा खऱ्या अर्थाने विकास होण्यासाठी ग्रामसभा मजबूत होणे आवश्यक आहे. ग्रामसभेची कर्तव्ये व जबाबदाऱ्या आणि ग्रामसभेचे अधिकार याची माहिती गावातील सर्व जनतेला व्हावी, या उद्देशाने विहित वेळापत्रकाप्रमाणे ग्रामसभेचे आयोजन करण्याच्या सूचना वेळोवेळी देण्यात आल्या आहेत. त्या अनुषंगाने सन्माननीय सदस्यांनी सुचविलेल्या सूचनांमध्ये सुधारणा करणे ही ग्रामपंचायतीच्या ग्रामसभांच्या अनुषंगाने आताच्या काळाची गरज ठरली आहे. ग्रामसभेचा अध्यक्ष ग्रामपंचायतीचा सरपंचच असला पाहिजे, महिलांसाठी ३० टक्के निधी खर्च करावा, ग्रामसभा उधळणाऱ्यांवर कडक कारवाई करावी, इत्यादि बाबींचा अभ्यास करण्याकरीता तज्ज्ञांची समिती गठीत करण्यात यावी. या समितीची संरचना पुढीलप्रमाणे असावी :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | डॉ. मल्लिनाथ कलशेट्टी, मुख्य कार्यकारी अधिकारी, यवतमाळ | - | अध्यक्ष |
| २) | श्री. एन. पी. मित्रगोत्री, उपायुक्त (आस्था), नागपूर | - | सह अध्यक्ष |
| ३) | श्री. सत्यजीत बडे, उप मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे | - | सदस्य |
| ४) | श्री. रणधीर सोतवंशी, उप मुख्य कार्यकारी अधिकारी, नाशिक | - | सदस्य |

५) डॉ. गोपाळ पंडगे, उपसंचालक, राजमाता जिजाऊमाता बाल आरोग्य व पोषण मिशन - सदस्य

६) श्री. जगन्नाथ भोर, उप मुख्य कार्यकारी अधिकारी, अहमदनगर - सदस्य सचिव

सदर तज्ज्ञांची समिती सदर बाबींच्या अनुषंगाने अभ्यास करुन अहवाल सादर करील व अशा बाबीविषयी अधिक सखोल अभ्यास करुन आणि छाननी करुन आताच्या काळाच्या गरजेनुसार अहवाल सादर करण्यात येईल. तसेच सदर तज्ज्ञांच्या समितीतील सदस्यांना प्रवासभात्ता, मानधन किंवा कोणत्याही प्रकारचे इतर भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

सदर समितीची पहिली बैठक यवतमाळ येथे माहे ऑगस्ट, २०१४ च्या तिसऱ्या आठवड्यात घेण्यात यावी व दुसरी बैठक प्रस्ताव अंतिम करण्यासाठी मुंबई / पुणे येथे १५ सप्टेंबर, २००५ पूर्वी धेण्यात यावी व शासनास अहवाल सादर करावा.

समितीस आवश्यकतेनुसार अन्य तज्ज्ञ व्यक्तींना सदर विषयासंदर्भात सल्ला देण्यासाठी “विशेष निमंत्रित” म्हणून बोलविता येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२७१४४८३२५०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Fakkadrao Landge

Digitally signed by Shivaji Fakkadrao Landge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Shivaji Fakkadrao Landge
Date: 2014.09.02 15:57:04 +05'30'

**शि. फ. लांडगे**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३. गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)

**प्रत माहितीसाठी**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२

३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
४. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई § ३२
५. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई § ३२
६. सर्व विधानसभा / विधानपरिषदेचे सदस्य
७. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
८. डॉ. मल्लिनाथ कलशेट्टी, मुख्य कार्यकारी अधिकारी, यवतमाळ
९. श्री. एन. पी. मित्रगोत्री, उपायुक्त (आस्था), नागपूर
१०.श्री. सत्यजीत बडे, उप मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे
११.श्री. रणधीर सोमवंशी, उप मुख्य कार्यकारी अधिकारी, नाशिक
१२.डॉ. गोपाळ पंडगे, उप संचालक, राजमाता जिजाऊमाता बाल आरोग्य व पोषण मिशन
१३.श्री. जगन्नाथ भोर, उप मुख्य कार्यकारी अधिकारी, अहमदनगर
१४.महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
१५.सर्व मंत्रालयीन विभाग
१६.ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व पर्यवेक्षकीय अधिकारी
१७.निवडनस्ती (कार्यासन क्रमांक पंरा-३)